सांकेतिक क्रमांक - २०१४१२०११३०२५४८२२८

**उंदरी मांजरी साठवण तलाव, ता.मुखेड, जि.नांदेड, या योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
शासन निर्णय क्र. लपात -२१११/(४०३/२०११)/लपा-२
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक १६/०४/२०१३

पहावे : १) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ यांचे पत्र क्र. गोमपाविम/ता-३/७०७३, दि. १४.०७.२०११
२) शासन परिपत्रक क्र. सुप्रमा/०४११/(२६२/२०११)/मोप्र-१, दिनांक १०.०८.२०११

**प्रस्तावना :**

उंदरी मांजरी साठवण तलाव, ता.मुखेड, जि. नांदेड या योजनेस गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळाचा निर्णय क्र. गोमपाविम/प्रमा/तां-३/नांपामं/उंदरी (मांजरी) सा.त./२४, दि.१६.०८.२००६ अन्वये एकूण अंदाजित खर्च रु.३७४.०८ लक्ष किंमतीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. यापैकी रु.३०९.५५ लक्ष कामाप्रीत्यर्थ आणि रु ६४.५३ लक्ष अनुषंगिक खर्च आहे. हा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव तयार करतांना सन २००५-०६ च्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले होते. मध्यंतरीच्या काळात योजनेच्या खर्चात दरसूचीतील बदल, जास्त दराची निविदा स्विकृतीमुळे, भूसंपादन किंमतीतील झालेली वाढ, भाववाढ संकल्पचित्रातील बदल इत्यादी कारणांमुळे योजनेची अद्ययावत अंदाजित किंमत प्रशासकीय मान्यता प्राप्त किंमतीच्या दहा टक्क्याहून अधिक वाढत असल्यामुळे योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे आवश्यक झाले आहे.

**शासन निर्णय**

शासन आता या निर्णयान्वये उंदरी मांजरी साठवण तलाव, ता.मुखेड, जि. नांदेड या योजनेचा एकूण अंदाजीत खर्च रुपये ९०२.४४ लक्ष (रु नऊ कोटी, दोन लक्ष, चव्वेचाळीस हजार, फक्त) किंमतीस जमीन ताब्यात आल्याशिवाय निविदा करु नये. तसेच उपयोगिता प्रमाणपत्र सप्टेंबर, २०१३ नंतरच्या व्यय अग्रक्रम समितीच्या बैठकीत देणेत येईल. या अटीच्या अधीन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करीत आहे. यापैकी रुपये ८४८.४० लक्ष (रुपये आठ कोटी, अठ्ठेचाळीस लक्ष, चाळीस हजार,फक्त) कामाप्रीत्यर्थ व रुपये ५४.०४ (रुपये चोपन्न लक्ष, चार हजार,फक्त) अनुषंगीक खर्च आहे. अंदाजपत्रकात उर्वरित कामासाठी सन २००९-१० या वर्षाच्या दरसूचीप्रमाणे दर वापरण्यात आले आहेत. उपशिर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबत परिशिष्टामध्ये जोडला आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-५,"४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च ८०-सर्वसाधारण (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (००) (०४) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ भाग भांडवली अंशदान (योजनांतर्गत) संगणक सांकेतांक क्र. ४७०२ ४९९ २" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

ठळक बाबी

अ) या योजनेची सिंचन क्षेत्र २९४ हेक्टर आहे.

ब) या योजनेमुळे एकूण होणारा पाणीसाठा १७११ सघमी. आहे.

क) प्रति सहस्त्र घनमीटर पाणीसाठा किंमत रु. ५२७४४/- (मापदंड रु.४१४७२/- )

ड) लाभव्यय प्रमाण १.०७ (अवर्षण प्रवण क्षेत्रातील योजना)

हा निर्णय पाटबंधारे व वीज विभाग क्रमांक एपीएच/१०७३/३२६५६ (ई-३) दि.१७.१०.७४ मधील परिशिष्ट क्रमांक २ (अ) नुसार, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३२७/१४३४, दिनांक २२.२.२०१२ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३/व्यय-१२, दिनांक ८.१.२०१२ अन्वये दिलेल्या मंजूरीनुसार व वित्त विभागाचे पत्र क्र.व्यअस-२०१३/प्र.क्र.६/अर्थसं-२, दि.११ मार्च, २०१३ अन्वये व्यय अग्रक्रम समितीने दिलेल्या मंजूरीनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकिय मान्यता (३०/२०१३) अनुक्रमांकावर नोंदण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( सं.तु.बावस्कर )
कार्यासन अधिकारी, जलसंपदा विभाग

प्रतिलिपी.

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई ३२
नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई ३२.
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, औरंगाबाद
(सोबत सुधारित प्रशासकीय मान्यतेची परिनिरीक्षण टिप्पणी जोडली आहे)
आंतर वित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
अधीक्षक अभियंता, नांदेड पाटबंधारे मंडळ, नांदेड
कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, नांदेड
अर्थशाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
लपा-१ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, लातूर /नांदेड
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई. (२ प्रती)
लपा-२, संग्रहार्थ.

D:\Bawaskar\2012\Undrimanjariसाठवण तलाव.doc

शासन निर्णय क्रमांक : लपात २१११/(४०३/२०११)/लपा-२, दि.१६/०४/२०१३ चे परिशिष्ट

## उंदरी मांजरी साठवण तलाव, ता.मुखेड, जि. नांदेड

### उपशिर्षनिहाय तरतूदी

| क्र. | उपशिर्ष | रक्कम (लक्ष) |
|---|---|---|
| १. | 'ए' प्राथमिक | ०.३४ |
| २. | 'बी' भूसंपादन | ३०८.०६ |
| ३. | 'सी' कामे | ५३५.७६ |
| ४. | डी- विमोचक | ------ |
| ५. | 'के' इमारत | ०.५० |
| ६. | "एम' वृक्षरोपन | ०.२५ |
| ७. | ओ-संकीर्ण | १.५० |
| ८. | 'पी' दुरुस्ती | १.५० |
| ९. | 'आर' रस्ते | ०.५० |
| ९ | प्रकल्प एकुण | ८४८.४० |
| १० | आनुषंगिक खर्च | ५४.०४ |
| ११ | योजनेची एकूण किंमत (रु.लक्ष) | ९०२.४४ |